भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील वाढीव मोबदला रक्कम अदा करणेबाबत.
सीमा तपासणी नाका, वरुड, जि.अमरावती

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०११९/प्र.क्र.२६/परि-४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २६ नोव्हेंबर २०२१

वाचा :-

१) मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.), अचलपुर यांचेकडील भुसंदर्भ क्र. भुसंदर्भ क्र.४४/२०११ वरील दि.१६.०७.२०१९ चे न्यायालयीन आदेश.
२) गृह विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८.०६.२०१९.
३) उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (अ.व प्र.), लाभक्षेत्र क्र.२, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती यांचे पत्र क्र. उपजि/अ. व प्र./प्र.क्र.२/अ.का./कावि २८२/२१, दिनांक १९.०४.२०२१.
४) परिवहन आयुक्त, मुंबई यांचे पत्र क्र. पकआ-२ अ/सीतना-आधु/प्र.क्र.४५-१२१७ / २०१९/ जा. क्र. ११६४०, दि.१५.२.२०२१.

प्रस्तावना :-

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका कारंजा बहिरम, ता. चांदुरबाजार, जि. अमरावती (जुने नांव खरपी) या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील भूसंदर्भ क्र.४४/२०११ संदर्भात मा.दिवाणी न्यायालय (वरिष्ठस्तर), अचलपूर यांनी दिलेल्या न्यायनिवाड्यानुसार वाढीव मोबदल्याच्या फरकाची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील शासन निर्णयान्वये भूसंदर्भ क्र.४४/२०११ संदर्भात मा.दिवाणी न्यायालय (वरिष्ठस्तर), अचलपूर यांनी दिलेल्या न्यायनिवाड्यानुसार वाढीव मोबदल्यापैकी उपर्निर्दिष्ट क्र.३ येथील पत्रान्वये उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (अ.व प्र.) जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती यांनी परिगणित केलेली देय रक्कम एकूण रु. ३३,९७,७०२/- पैकी रु. १२,०२,३४७/- इतकी रक्कम मा. न्यायालयात भरणा केली आहे.

२. आता, उपर्निर्दिष्ट क्र. ४ येथील पत्रान्वये कळविल्यानुसार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या संपादक संस्थेच्या सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरण अंतर्गत सीमा तपासणी नाका कारंजा बहिरम, ता. चांदुरबाजार, जि. अमरावती या सार्वजनिक प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या संबंधात भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खालील, खाली नमूद केलेल्या भूसंदर्भांमधील प्रकरणात मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.), अंचलपूर यांचेकडील भुसंदर्भ

क्र.४४/२०११ व आर.एम.जे.सी. क्र.४४१/२०१९ दिनांक १६.१२.२०१९ चे न्यायालयीन आदेश विचारात घेता, वाढीव मोबदला परिगणीत केला असून वाढीव मोबदला रक्कमेवर प्रथम वर्षाकरीता वाढीव ९ टक्के व पुढील प्रत्यक्ष खातेदारांना रक्कम मिळेपर्यंतच्या कालावधीसाठी १५ टक्के या दराने व्याजासह रक्कम अदा करण्याचे आदेश दिले आहेत. परिगणनेनुसार सदर प्रकरणी मौजे कारंजा बहिरम, ता. चांदुर, जि. अमरावती येथील भुसंपादनापोटी दिनांक १९.०४.२०२१ अखेर सुधारीत वाढीव मोबदला फरकाची रक्कम रु. २१,९५,३५५/- (रुपये एकवीस लाख पंच्यान्नव हजार तीनशे पंचावन्न फक्त) मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.), अचलपूर येथे भरणा करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या **परिशिष्ट -अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे. तरी सदरची रक्कम तातडीने मा. दिवाणी न्यायालयात भरणा करण्याची दक्षता जिल्हाधिकारी, अमरावती /उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २, अमरावती यांनी घ्यावी.

३. सदरची रक्कम पुढील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

अ) भुसंदर्भ क्र. ४४/२०११ दि.१६.१२.२०१९ चे न्यायालयीन आदेशाच्या अनुषंगाने वाढीव मोबदला फरकाची रक्कम जमा करताना लेखी स्वरुपात मा. न्यायालयाच्या निदर्शनास आणावी. ही जबाबदारी जिल्हाधिकारी, अमरावती /उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २, अमरावती यांची राहील.

आ) मंजूर केलेली वाढीव मोबदला रक्कम हितसंबंधितांनी योग्य त्या बँक हमी शिवाय उचलू नये , अशी लेखी विनंती जिल्हाधिकारी, अमरावती /उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २, अमरावती यांनी मा. न्यायालयास करावी.

इ) याकरीता उपजिल्हाधिकारी, (भुसंपादन) लाभक्षेत्र क्र.२ (अवप्र), अमरावती यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर जिल्हाधिकारी, अमरावती यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

(ई) निधी अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरिक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही तसेच मा. न्यायालयाच्या आदेशानुसार वाढीव मोबदला फरकाची रक्कम अदा करण्यास विलंब होणार नाही याबाबतची दक्षता उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व प्र. लाभक्षेत्र क्र.२, अमरावती तसेच प्रादेशिक परिवहन अधिकारी, अमरावती यांनी घ्यावी.

४. याबाबी साठी होणारा खर्च हा "मागणी क्र. मागणी क्र. बी-३ २०४१, वाहनांवरील कर,(०१)(०५) सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण व संगणकीकरण (२०४१ ०३१२) १३- कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. परिवहन आयुक्त, मुंबई यांनी वरील लेखाशिर्षातर्गत त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीपैकी परिशिष्ट-अ मधील नमूद रक्कम उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती यांना बीडीएस प्रणालीवर तात्काळ वर्ग करावी.

६. उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २, अमरावती यांनी या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही वादी/खातेदारास उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २, अमरावती व न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२६१३२४२१७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2021.11.26 13:28:54 +05'30'

**( भ. रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) जिल्हाधिकारी, अमरावती.
४) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
५) सह सचिव,(भूसंपादन) महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई
६) उपजिल्हाधिकारी (भुसंपादन), अ. व. प्र. लाभक्षेत्र क्र. २ अमरावती
७) प्रादेशिक परिवहन अधिकारी , अमरावती
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९) जिल्हा सरकारी वकील, अमरावती
१०) महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
११) महालेखापाल-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१२) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-१२/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (परिवहन-४).

## परिशिष्ट-अ

| एलएसी क्र.४४/२०११ & RMJC No.४४१/२०१९ मोबदला निधी | | |
|---|---|---|
| १ | न्यायालयाचे दिनांक १६.१२.२०१९ आदेशाप्रमाणे (सर्व्हे नं. ४९३ संपादन क्षेत्र २.०४ हे. आर.) न्यायालयाने दिलेला दर रु. ५६८१८२/- प्रति हेक्टर-विभूसअ यांनी मूळ निवाड्यात दिलेली रक्कम रु. ३२४७८७/- | रु. ८,३४,३०४ |
| २ | न्यायालयाच्या दिनांक १६.१२.२०१९ च्या आदेशानुसार ३०% दिलासा रक्कम | रु. २,५०,२९१ |
| ३ | न्यायालयाच्या दिनांक १६.१२.२०१९ च्या आदेशानुसार १२% प्रमाणे प्रति वर्ष विशेष घटक अंतर्गत रक्कम-(दि.०६.०६.२००८ ते दि.०७.१२.२००९ कालावधी १८ महिने) अनुक्रमांक १ वरील रक्कमेवर | रु. १,५०,१७५ |
| ४ | एकूण देय रक्कम (१+२+३) | रु. १२,३४,७७० |
| ५ | न्यायालयाच्या दि १६.१२.२०१९ व दि.२४.१०.२०१७ च्या आदेशानुसार ९% दराने व्याज (दि.०८.१२.२००९ ते दि.०६.१२.२०१०) (एक वर्षाकरीता) अ.क्र.४ वरील रक्कमेवर | रु. १,११,१२९ |
| ६ | न्यायालयाच्या दि.१६.१२.२०१९ व दि.२४.१०.२०१७ च्या आदेशानुसार १५% दराने व्याज (दि.०७.१२.२०१० ते दि.१९.०४.२०२१) (४०३० दिवस किंवा १३२ महिने १२ दिवस) | रु.२०,४४,९८३ |
| ७ | न्यायालयाच्या दि.२४.१०.२०१७ च्या आदेशानुसार पोसेस परिव्यय | रु.६८२० |
| ८ | एकूण देय रक्कम (४+५+६+७) | रु.३३,९७,७०२ |
| ९ | न्यायालयाच्या दि.१६.१२.२०१९ च्या आदेशानुसार न्यायालयात भरलेली रक्कम | रु.१२,०२,३४७ |
| | **एकूण देयक रक्कम (८-९)** | **रु.२१,९५,३५५** |
| एकूण देय रक्कम २१,९५,३५५/- (अक्षरी रुपये एकवीस लक्ष पंच्यान्नव हजार तीनशे पंचावन्न फक्त) | | |